# देवमासा हंफ्रे वाट चुकतो तेव्हा..

[खरोखर घडलेली गोष्ट]



लेखक- वेंडी ताकुदा आणि रिचर्ड हॉल

चित्रे- हनाको वाकियामा

भाषांतर- वंदना भागवत


SHAG SLOUGH
SACRAMENTO RIVER
SUISUN BAY
BENICIA
VALLEJO
MARTINEZ
SAN PABLO BAY
NOVATO
RICHMOND
RICHMOND-SAN RAFAEL BRIDGE
BERKELEY
SAN RAFAEL
OAKLAND
MILL VALLEY
SAUSALITO
BAY BRIDGE
GOLDEN GATE BRIDGE
SAN FRANCISCO
SAN LEANDRO
SAN BRUNO
SAN FRANCISCO BAY
HAYWARD
SAN MATEO BRIDGE
PACIFICA
FREMONT
BURLING
SAN MATEO
FARALLON ISLANDS
PACIFIC OCEAN
DUMBARTON BRIDGE
SAN JOSE
REDWOOD CITY
HALF MOON BAY

# देवमासा हंफ्रे वाट चुकतो तेव्हा..

[खरोखर घडलेली गोष्ट]

लेखक- वेंडी ताकुदा आणि रिचर्ड हॉल

चित्रे- हनाको वाकियामा

भाषांतर- वंदना भागवत





आपली गोष्ट सुरु होते दूर दूर समुद्रात. त्या दिवशी लख्ख ऊन पडलं होतं. वशिंडवाल्या देवमाशांचा एक कळप दक्षिणेकडे निघाला. उत्तरेकडचा हिवाळा फार कडक. गोठवून टाकणारी थंडी असते तिथं. म्हणून त्यांना यावं लागतं दक्षिणेकडे.

हे वशिंडवाले देवमासे फार विलक्षण जलचर आहेत. खोल पाण्यात पोहताना ते एकमेकांशी गाणी गात बोलतात.

जगभरात फारच थोडे वशिंडवाले देवमासे आहेत. त्यांच्यातला प्रत्येक मासा आगळावेगळा असतो. ते अतिशय हुषार असतात. दर हिवाळ्यात ते दक्षिणेकडे येतात, आणि दर उन्हाळ्यात उत्तरेकडे परत जातात. त्यांना त्यांचा रस्ता अचूक माहिती असतो.



हुषार असले तरी देवमासेसुध्दा कधीतरी चुकतात. आपला हा हम्फ्रे देवमासा होता ना त्यानं तर फारच मोठ्ठी चूक केली. त्यानं त्याच्या मित्रांना सोडून दिलं आणि एकटाच गोल्डन गेट पुलाखालून सॅन फ्रॅनसिस्कोच्या खाडीत भटकत आला.

देवमासा खाडीत आलेला बघून सगळे थक्क झाले. वशिंडवाले मासे खोल खोल पाण्यात असतात. ते सहजी बघायला मिळत नाहीत आपल्याला. त्यामुळं सॅन फ्रॅनसिस्कोच्या खाडीत आलेला देवमासा बघायला मिळणं म्हणजे पर्वणीच होती लोकांना.

हम्फ्रे देवमासा म्हणजे अचाट दृश्य होतं. गावात बस हिंडायची ना तेवढा तो लांब होता. सात हत्ती एकत्र केले तर केवढे दिसतील? तेवढा त्याचा आकार होता. जादू व्हावी तसा तो अचानक पाण्याच्या वर दिसायचा. श्वास घ्यायला त्याचं नाक पाण्याबाहेर काढायचा. लोक हातातल्या सगळ्या गोष्टी बाजूला टाकून त्याला बघतच राहयचे.





आणि मग कोणत्याही देवमाशानं केली नसती अशी गोष्ट हम्फ्रेनं केली. वळून परत मागे खोल समुद्रात जायच्या ऐवजी तो चुकीच्या दिशेनं सॅक्रॅमॅन्टो नदीत शिरला.

नदीत जायला लागला खरा, पण हम्फ्रे जसा पुढे पुढे गेला तसं नदीचं पात्र लहान लहान होत गेलं.

तो गोंधळला. अरेच्चा समुद्र कुठं गेला? असं त्याला वाटलं. पण त्याची वाट चुकली होती हे तर उघडच होतं.



हम्फ्रेला बघायला लोकांनी नदीकाठी मोठी गर्दी केली. तो श्वास घ्यायला कधी वर येतोय याची वाट बघत ते उभे असायचे. फुर्रर्र फवारा उडवत त्याची प्रचंड पाठ पाण्याच्या वर यायची. लगेच कोणीतरी तिकडे बोट करून ओरडायचा. 'तो पाहा तिकडे आहे देवमासा!' देवमासा दिसला की लोक अवाक व्हायचे.

पण भलतंच घडलं होतं. देवमाशांना समुद्राच्या खाऱ्या पाण्यात राहावं लागतं, नदीच्या गोड्या पाण्यात नाही येत राहाता त्यांना. गोड्या पाण्यात फार काळ राहायला लागलं देवमाशाला तर तो मरतो.

हम्फ्रे संकटात होता.

हम्फ्रेला लवकरात लवकर समुद्रात पाठवायला हवं. सगळ्यांना हे माहिती होतं. पण एवढा मोठा देवमासा परत समुद्रात कसा ढकलायचा? हे कळत नव्हतं. याआधी असं काही घडलं नव्हतं ना!

हम्फ्रे आत आत शिरायला लागला तशी लोकांची काळजी वाढायला लागली.... काही खायला तरी मिळतंय का त्याला? त्यांना प्रश्न पडला... तो आजारी पडला तर?

हम्फ्रे नदीच्या काठाशी आला तर? बापरे! एके दिवशी हम्फ्रेनं नवा घोळ घातला. नदीवरचा छोटासा पूल होता ना तो ओलांडून तो आणखी आतमध्ये आला. पुलाचे खांब इतके जवळ जवळ होते, त्यांच्या फटीतून मोठाच्या मोठा देवमासा कसा काय आत आला? समजेना. पण तो आत आला होता खरा. हा तर मोठाच गोंधळ. कारण आता तो पुरता अडकला.



पुलापलीकडे नदीचं पात्र  उथळ होतं शिवाय आणखीनच अरुंद होतं. इतकं अरुंद होतं की हम्फ्रेला त्यात वळताही येईना. आली ना पंचाईत. नदीचं अरुंद पात्र. दोन्ही काठांशी शेती. आणि नदीच्या मधोमध अडकलेला देवमासा. लोकांचा विश्वासदेखील बसेना.

हम्फ्रेला तिथून बाहेर काढण्यासाठी लवकरात लवकर काही करायला हवं होतं. हम्फ्रे आता आजारी दिसायला लागला. तो लवकर समुद्रात गेला नसता तर तो मेला असता. शास्त्रज्ञांना हे माहिती होतं. वेळ निघून चालली होती. त्याला तातडीनं समुद्रात न्यायला हवं होतं.



हम्फ्रेला वाचवण्यासाठी काही लोक नदीत उतरले होते, त्यांना तातडीनं उपाय शोधायचा होता. त्यात शास्त्रज्ञ होते, किनाऱ्यावरचे तटरक्षक होते, आणखीही बरेचजण एकत्र आले होते. ते त्याला वाचवण्याची धडपड करायला लागले. पाण्याच्या आत लांब नळ्यांमधून मोठमोठ्यांदा आवाज करायचं त्यांनी ठरवलं. म्हणजे तो घाबरुन दिशा बदलेल आणि वळून समुद्राकडे जाईल.





त्याच बरोबर देवमासे खाताना जे आवाज करतात ते रेकॉर्ड केलेले आवाजही त्यांनी पाण्याच्या आत वाजवायला सुरुवात केली. हम्फ्रे उपाशी होता. एकटाच होता. खाण्याचे आवाज ऐकून तो समुद्राच्या दिशेने वळेल असं त्यांना वाटत होतं.



आणि अगदी तस्संच झालं. हम्फ्रे वळला
आणि समुद्राच्या दिशेनं निघाला. सगळ्यांना
हुश्श झालं... पण संकट अजूनही टळलं नव्हतं.



लोक मोठ्यांदा नळे वाजवत होते. त्यानं
त्याचा पार गोंधळ उडाला. काय करेल तो?



हम्फ्रे त्या छोट्याश्या पुलाशी आला आणि थांबला. आता
त्याला त्या पुलाच्या खांबांमधून जायची भीती वाटायला लागली.
त्याला तो मावेल अशी जागाच सापडेना. खांब अडवायला लागले.



नळे वाजतच होते. हम्फ्रे चिडला. तो इकडे वळायचा, तिकडे वळायचा,
त्याची भली मोठी शेपटी आपटायचा. मग लोकांनी नळे वाजवायचं थांबवलं.

हम्फ्रेच्या मित्रांनी अजूनही प्रयत्न सोडले नव्हते. त्या छोट्याश्या पुलाखालून कसंही करुन त्याला बाहेर काढायचंच असं त्यांनी ठरवलं होतं. त्यांनी त्याला बाहेर काढलं नसतं तर नदीच्या पाण्यात तो मेला असता.

मग त्या पुलाखाली त्याला जाण्यासाठी जागा करुन द्यायची असं त्याला वाचवणाऱ्या लोकांनी ठरवलं. त्यांनी एक प्रचंड क्रेन आणली. पुलाचे काही खांब त्यांनी कापून काढायचं ठरवलं. रातोरात त्यांनी ते कापूनही काढले.



त्याला जाण्यासाठी आता पुरेशी जागा आहे हे हम्फ्रेच्या लक्षात येईल का?

दुसरे दिवशी लोकांनी परत एकदा नळे वाजवायला सुरुवात केली. भों।! भों! भों! पाण्यात होड्या घेऊन उतरलेले लोक त्याच्या जवळ जवळ जायला लागले. तो समुद्राच्या दिशेनं जावा म्हणून त्याला पुलाच्या दिशेनं घालवायला लागले.

आता जर तो गेला नाही तर त्याचं काही खरं नव्हतं. लोक चिंतेत पडले होते. त्याच्याकडे बघत होते. कळेल का त्याला? जाईल का तो?





हम्फ्रे शूर होता. तो त्या पुलाच्या खांबांपाशी गेला. पण तो पुलाखालून पोहत पुढे सरकला तशी त्याचं डोकं खांबांमध्ये अडकलं. तो जोरजोरात डोकं हलवत होता. खालीवर करत होता. सोडवून घेण्याचा प्रयत्न करत होता.

लोकांनी श्वास रोखून धरले. तो क्षण मोठा कठीण होता. ते हम्फ्रेची सुटका करु पाहात होते, पण तो मरणाच्या दारात उभा होता.





अचानक हम्फ्रेनं त्याचा एक लांबलचक कल्ला उचलला आणि त्या सापटीतून पुढं सरकला. त्याचं डोकं पुलाला आपटलंच असतं, पण राहिलं. त्यानं त्याचं अंग वळसलं आणि त्या खांबांच्या सापटीमधून तो बाहेर पडला आणि पोहत दुसऱ्या बाजूला गेला.

नदीच्या काठावरुन एकच जल्लोष झाला. कोणीतरी आनंदानं आरोळी ठोकली, मग दुसऱ्यानं, मग तिसऱ्यानं. सगळेजण हम्फ्रेला शाब्बास शाब्बास म्हणत होते. 'हुर्रे हम्फ्रे! हुर्रे!' ते ओरडत होते. हम्फ्रेनं जमवलं. हरवलेला हम्फ्रे अखेरीस त्याच्या घराकडं निघाला.



त्याच्या मागच्या होड्यांच्या ताफ्यानं आणि भों भों वाजणाऱ्या भोंग्यांनी त्याला नदीतून समुद्रात जायला मदत केली. आणि अखेरीस हम्फ्रे सॅन फ्रॅनसिस्कोच्या खाडीत शिरला.

हम्फ्रे एक दिवसभर आनंदाने खाडीत बागडत राहिला. किनाऱ्यावर त्याला शेवटचं एकदा बघायला जमलेल्या लोकांना त्यानं नाना तऱ्हेच्या कसरती करुन दाखवल्या. तो शेपटीचा सपकन फटकारा मारायचा आणि लोक म्हणायचे 'ऊऊऊऊह...' तो हवेत उंच उडी घेऊन खाली यायचा आणि त्याचं पोट फटकन पाण्यावर आपटायचं तेव्हा लोक म्हणायचे 'आआआआहा.'

जणू काही त्याला वाचवलेल्या सगळ्या मित्रांचा हम्फ्रे निरोप घेत होता. त्यांचे आभार मानत होता. थँ........क्यू!



हम्फ्रेला ज्यांनी वाचवलं होतं ना, त्या लोकांनीसुध्दा हम्फ्रेचे आभार मानले. त्यांना त्याच्याबद्दल कृतज्ञता वाटत होती. वशिंडवाल्या देवमाशांबद्दल हम्फ्रेनं त्यांना खूप काही शिकवलं होतं. तो त्यांचा छान मित्रच झाला होता. हम्फ्रेला सोडवायचा आटापिटा चालला होता तेव्हा हम्फ्रेनं त्याच्या प्रचंड शेपटाचा एक साधा फटकारा दिला असता तर त्याला वाचवायला आलेल्या सगळ्या होड्या पार उलट्या पालट्या झाल्या असत्या. पण त्यानं तसं अजिबात केलं नाही. ते सगळे त्याचे मित्रच आहेत हे जणू काही त्याला समजलं होतं. अखेरीस एका दुपारी, धुक्यामधून पोहत, हम्फ्रे गोल्डन गेट पुलाच्या खालून समुद्रात परतला.

हम्फ्रे देवमाशानं प्रयत्न सोडले नाहीत आणि शेवटी तो त्याच्या घरी पोहोचलाच.

## हम्फ्रेविषयी काही नोंदी

वशिंडवाला देवमासा हम्फ्रे १० ऑक्टोबर १९८५ मध्ये पहिल्यांदा सॅन फ्रॅनसिस्कोच्या खाडीत आला. या ४५ फूट लांबीच्या आणि ४० टन वजनाच्या महाकाय माशाने लोकांची मने जिंकून घेतली. तो पॅसिफिक समुद्रात परत जाण्यासाठी त्याची वाट शोधत २६ दिवस खाडीत भटकला.



१९८५ मध्ये हम्फ्रेची सुटका केल्यानंतरही तो त्याच्या वार्षिक स्थलांतरात बे एरियात येत राहिला. १९८६ मध्ये तो बे एरियातल्या फरलॉन बेटांपाशी दिसला. नंतर १९८८ मध्ये बोडेगा बेटांजवळ. त्याच्या पाठीवरच्या कल्ल्यावर खास खुणा होत्या आणि त्याच्या शेपटीच्या हालचाली तो विशिष्ट प्रकारे करायचा. त्यावरुन शास्त्रज्ञांनी त्याला ओळखले.

त्यानंतर २२ ऑक्टोबर १९९० च्या पहाटे सॅन फ्रॅनसिस्कोच्या कँडलस्टिक पार्कजवळ, खाडीच्या किनाऱ्याशी चिखलात रुतलेला वशिंडवाला देवमासा लोकांनी बघितला. तिथले पाणी उथळ होते.



शास्त्रज्ञांनी त्याला बरोब्बर ओळखले. तो हम्फ्रेच होता. आपला जुना मित्र परत एकदा अडचणीत आला होता. पुढचे तीन दिवस सागरी सस्तन प्राणीकेंद्राचे मदतनीस आणि किनाऱ्यावरचे तटरक्षक मिळून हम्फ्रेला चिखलातून बाहेर काढायचा प्रयत्न करत होते. नंतर जेव्हा समुद्राला उधाण आले तेव्हा त्यांनी त्याच्या पोटाखाली वाऱ्याचा जोरदार झोत सोडला आणि त्याला समुद्रात ढकलले. हम्फ्रे एक दिवसभर खाडीत फिरत राहिला. नंतर गोल्डन गेट पुलाखालून पॅसिफिक समुद्रात शिरला- परत एकदा मुक्त झाला.



